अकृषि विद्यापीठामधील अध्यापकांच्या भरती प्रक्रीयेमध्ये अधिक पारदर्शकता आणण्यासाठी कार्यपध्दती विहित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण -२०२५/ ई-८६०४२१ /विशि-१,**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक:- २८ फेब्रुवारी, २०२५

**वाचा:-**

१. भारताचे राजपत्र: असाधारण, भाग III-विभाग ४, युजीसी नोटिफिकेशन दिनांक १८ जुलै २०१८.
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दिनांक ८ मार्च २०१९.
३. उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शुद्धीपत्र क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५६/१८/विशि-१, दिनांक १० मे २०१९.
४. उच्च आणि तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२३०९/प्र.क्र.१२८/विशि-१, दिनांक ५ मार्च, २०२४.
५. मा. राज्यपाल यांचे अवर सचिव (शिक्षण), राजभवन यांचे पत्र क्रमांक आरबी/जीइएन-२०२४/सीआर-९२८/इडीएन.५/१८२, दिनांक २५ फेब्रुवारी,२०२५.

**प्रस्तावना:-**

उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थामधील अध्यापकांकरीता विद्यापीठ अनुदान आयोगाकडून शैक्षणिक अर्हता आणि अनुषंगिक बाबी विहित करण्यात येतात. विद्यापीठ अनुदान आयोगाकडून दि. १८ जुलै, २०१८ च्या अधिसूचनेद्वारे उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थांकरिता "Minimum qualifications for appointment of teachers and other academic staff in Universities and Colleges and Measures for the maintenance of standards in Higher Education" निश्चित करण्यात आली आहेत. सदर अधिसुचनेतील तरतूदी उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि. ८ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राज्यात लागू करण्यात आल्या आहेत. उपरोक्त अधिसूचना आणि शासन निर्णयांतील तरतूदी विचारात घेऊन विद्यापीठामधील अध्यापकांची निवड प्रक्रीया राबविण्यात येते. सदर निवड प्रक्रीया अधिक पारदर्शक, निष्पक्ष आणि संतुलित व्हावी यासाठी मा.कुलपती तथा राज्यपाल महोदयांच्या कार्यालयाकडून प्राप्त झालेले निर्देश विचारात घेऊन कार्यपध्दती विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अकृषि विद्यापीठांमधील अध्यापकांच्या निवड प्रक्रीयेसाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे:-

(१) विद्यापीठांमधील सहायक प्राध्यापक या पदाच्या मुलाखतीसाठी उमेदवार निवडीचे निकष, संदर्भीत दि.८ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-दोन मधील तक्ता:३अ प्रमाणे विहित करण्यात आले आहेत. (GR dt. 08.03.2019 Appendix-II Table:3A Criteria for Short-listing of Candidates for Interview for the post of Assistant Professors in Universities) सध्याच्या पध्दतीनुसार सदर निकष मुलाखतीकरिता

उमेदवारांची निवड करण्यासाठी वापरण्यात येतात. त्यात सुधारणा करून यापुढे उमेदवारांचे शैक्षणिक क्रेडेन्शियल आणि त्यांची मुलाखतीमधील कामगिरी अशा दोन्ही बाबी एकत्रित करून अधिक पारदर्शक, निष्पक्ष आणि संतुलित निवड प्रक्रिया विहित करण्यात येत आहे.

(२) त्यानुसार शैक्षणिक गुणवत्ता, संशोधन आणि अध्यापन या बाबींना ८०% इतके गुण (वेटेज) देण्यात यावे. मुलाखतीमधील कामगिरीसाठी २०% इतके गुण (वेटेज) देण्यात यावे. वरील दोन्ही बाबी एकत्र करून १०० गुणांपैकी प्राप्त गुणांनुसार उमेदवारांची गुणवत्ता यादी निवडीकरिता तयार करण्यात यावी. तसेच एकत्रित १०० गुणांपैकी किमान ५० टक्के गुण प्राप्त केलेल्या उमेदवारांनाच अंतिम निवडीसाठी पात्र समजण्यात यावे.

(३) शैक्षणिक गुणवत्ता, संशोधन आणि अध्यापन इत्यादी निकषांच्या आधारे ( संदर्भीत दि.८ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-दोन मधील तक्ता: ३अ नुसार) उमेदवारांनी प्राप्त केलेले गुण विद्यापीठाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करावेत.

(४) अध्यापन क्षमता अथवा संशोधन प्राविण्य (aptitude) यांचे मुल्यमापन परिसंवाद (seminar) अथवा व्याख्यान प्रात्यक्षिक (lecture in a classroom situation) अथवा अध्यापन आणि संशोधन यामधील नवीनतम तंत्रज्ञान वापरण्याच्या क्षमतेवरील चर्चा या बाबी मुलाखतीच्या टप्प्यावर शक्य तेथे विचारात घ्याव्यात.

(५) निवड समितीच्या सर्व सदस्यांनी मुलाखतीकरिता दिलेल्या गुणांची सरासरी विचारात घेऊन उमेदवाराचे मुलाखतीचे गुण निश्चित करण्यात यावे.

(६) निवड समितीच्या बैठकांचे दृक-श्राव्य चित्रिकरण करण्यात यावे. निवड प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर तात्काळ, उपरोक्त दृक-श्राव्य चित्रिकरण, बैठकीला उपस्थित असलेल्या निवड समितीच्या सर्व सदस्यांच्या स्वाक्षरीने सीलबंद करावे.

(७) मुलाखती पूर्ण होताच त्याच दिवशी अथवा दुसऱ्या दिवशी निकाल जाहीर करावा.

(८) वरील सर्व निवड प्रकिया सहायक प्राध्यापक पदासहीत सहयोगी प्राध्यापक आणि प्राध्यापक पदांच्या निवड प्रक्रियेसाठी लागू राहील.

२. वरील कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात येईल, या अटीच्या अधीन राहून राज्य विद्यापीठांमधील सध्या सुरू असलेली अध्यापकांची निवड प्रक्रिया पूर्ण करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच, भविष्यात होणारी राज्य विद्यापीठांमधील अध्यापकांच्या निवड प्रक्रियेकरिता याच कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२८१३२६३३३८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.02.28 13:28:09 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद.
६. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सह सचिव / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व विभागीय सहसंचालक, उच्चशिक्षण,
१२. सर्व कुलसचिव, सार्वजनिक विद्यापीठे.
१३. कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ नाशिक.
१४. कुलसचिव, कवि कुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
१५. सर्व कुलसचिव, राज्य अभिमत विद्यापीठे.
१६. सर्व कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठे,
१७. कुलसचिव, राज्य समुह विद्यापीठे.
१८. निवड नस्ती